**महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहीम सन २०१०-११ मधील पुर्नमुल्यांकनानुसार पुरस्कारासाठी प्राप्त गावांची यादी घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः तंमुगा-१०१२/प्र.क्र-४३/पोल-१५**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीखः १९ मे, २०१५

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः तंमुगा १०११/प्र.क्र-७२/२०११/पोल-१५, दि.३/९/२०११
२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं/४०/९०६९/मगातंमुगा समिती कार्यालय/१०१२/ दि. १५/१/२०१३ व क्र. पोमसं/४०/९०६९/मगातंमुगा समिती कार्यालय/२३/१०११/ दि. १७/२/२०१४, २६/३/२०१४ व २५/०६/२०१४.

**शासन निर्णय:-**

महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहीम सन २०१०-११ साठीच्या पुरस्कारप्राप्त गावांची घोषणा संदर्भाधिन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली होती.

२. सदर शासन निर्णयासोबतच्या यादीमधील भंडारा जिल्ह्यातील आलेसुर व धुटेरा या दोन ग्रामपंचायतीची लोकसंख्या प्रत्येकी अनुक्रमे ११३० व ७५४ एवढी दर्शविली असल्यामुळे त्यांना अनुक्रमे रुपये २ लाख व रुपये १ लाख एवढी रक्कम दि. ३ सप्टेंबर, २०११ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आली होती. तथापि, संबंधीत ग्रामपंचायतीचे सरपंच आणि सचिव यांनी प्रमाणपत्राव्दारे ग्रामपंचायत आलेसुर या ग्रामपंचायतीमध्ये आलेसुर, गोडीयेला विटपूर खापा (खुर्द) व सितेकसा या गावांचा समावेश होत असल्यामुळे ग्रामपंचायतीची एकत्रित लोकसंख्या २५८० एवढी असल्याचे नमूद केले आहे. तसेच ग्रामपंचायत धुटेरा अंतर्गत धुटेरा, हिरापूर हमेशा, घानाडे सक्करदरा या गावांचा समावेश होत असल्यामुळे ग्रामपंचायतीची एकत्रित लोकसंख्या १२४९ एवढी होत आहे. या बाबी विचारात घेता ग्रामपंचायत आलेसुर व धुटेरा यांना अनुक्रमे रुपये ३ लाख व रुपये २ लाख एवढी रक्कम पुरस्कारापोटी देय ठरते. प्रत्यक्षात दि. ३ सप्टेंबर २०११ च्या शासन निर्णयान्वये त्यांना रुपये २,००,०००/- व रुपये १,००,०००/- एवढी रक्कम

मंजूर केलेली असल्यामुळे या दोन ग्रामपंचायतींना प्रत्येकी रु. १,००,०००/- एवढी अतिरिक्त रक्कम मंजूर करण्यात येत आहे.

३. तसेच भंडारा जिल्ह्यातील सातोना, गराडा (बुज.), बोरगांव (बु.), नेरी, सिरसी, टेकेपार (को), भोजापूर, मोहदुरा व दवडीपार या नऊ गावांच्या महात्मा गांधी तंटामुक्त गांवे मोहीमेच्या अध्यक्षस्थानी जिल्हाधिकारी आणि पोलीस अधिक्षक, भंडारा यांचेमार्फत या नऊ गावांचे जिल्हाबाह्य मूल्यमापन दुसऱ्या समितीमार्फत करण्याची विनंती विभागीय आयुक्त, नागपूर यांना केली होती. त्यानुसार विभागीय आयुक्त, नागपूर यांनी दि. १४/८/२००८ च्या निर्णयातील परिच्छेद क्र. १२ ते १५ मधील तरतूदीनुसार फेरतपासणी करुन अहवाल सादर करण्याच्या सूचना जिल्हाधिकारी, भंडारा यांना दिल्या होत्या.त्यानुसार वर्धा जिल्ह्यातील कारंजा तालुक्याच्या समितीकडून जिल्हाबाह्य फेरमूल्यांकन करण्यात येऊन सदरची नऊ गावे पुरस्कारासाठी पात्र ठरली आहेत. या नऊ गावांना फेरमूल्यांकनानुसार मिळालेले गुण व सन २००१ च्या जनगणनेच्या निकषानुसार असलेली लोकसंख्या व लोकसंख्येनुसार बक्षिसाची रक्कम परिशिष्ट अ प्रमाणे मंजूर करण्यात येत आहे.

४. भंडारा जिल्ह्यातील आलेसुर व धुटेरा या गावांना महात्मा गांधी तंटामुक्त रकमेतील तफावत प्रत्येकी १,००,०००/- तसेच भंडारा जिल्ह्यातील पुर्नमूल्यांकनानुसार पात्र नऊ गावांना देय रक्कम रुपये २३,००,०००/- अशी एकूण रुपये २५,००,०००/-(रुपये पंचवीस लाख फक्त) मंजूर करण्यात येत आहे.

५. महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहीमेअंतर्गत पुरस्कारासाठी होणारा उपरोक्त खर्च रुपये २५,००,०००/-(रुपये पंचवीस लाख फक्त) मागणी क्र. बी-१ प्रधानलेखाशिर्ष २०५५ पोलीस (००) (१०) तंटामुक्त गांव मोहीम, ३१ सहाय्यक अनुदाने याखालील सन २०१५-१६ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून करण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २०९/२०१५, दि.३०/४/२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१५०५१९१२१३५५३४२९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Ganpat Deshmukh

Digitally signed by Prakash Ganpat Deshmukh
DN: CN = Prakash Ganpat Deshmukh, C = IN, S = Maharashtra, O = GOVT. OF MAHARASHTRA, OU = HOME DEPARTMENT
Date: 2015.05.21 11:55:32 +05'30'

**सोबत : परिशिष्ट-अ**

**( प्र. ग. देशमुख )**
उपसचिव गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा. मंत्री/राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
५. सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. महालेखापाल, ½ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
९. विशेष पोलीस महानिरीक्षक, नागपूर
१०. विभागीय आयुक्त, नागपूर.
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, भंडारा.
१२. पोलीस अधिक्षक, भंडारा
१३. नागपूर परिक्षेत्रांचे विशेष पोलीस महानिरीक्षक
१४. जिल्हाधिकारी,भंडारा
१५. जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा
१६. वित्त विभाग (व्यय-७/अर्थ-१०), मंत्रालय, मुंबई.
१७. निवडनस्ती-पोल-१५

शासन निर्णय क्रमांक तंमुगा-१०१२/प्र.क्र-४३/पोल-१५,दिनांक:-१९ मे, २०१५ सोबतचे

परिशिष्ट-अ

| अ.क्र | जिल्ह्याचे नांव | तालुका | पोलीस ठाणे | गांवाचे नांव | लोकसंख्येनुसार बक्षिसाची रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | भंडारा | भंडारा | भंडारा | गराडा बुज | २,००,०००/- |
| २ | | | | बोरगांव बु. | २,००,०००/- |
| ३ | | | | मोहदुरा | २,००,०००/- |
| ४ | | | | भोजापूर | ५,००,०००/- |
| ५ | | | | सिरसी | २,००,०००/- |
| ६ | | | | टेकेपार को | २,००,०००/- |
| ७ | | | | दवडीपार/बा | २,००,०००/- |
| ८ | | मोहाडी | भंडारा | नेरी | ३,००,०००/- |
| ९ | | | | सातोना | ३,००,०००/- |

Prakash Ganpat Deshmukh

Digitally signed by Prakash Ganpat Deshmukh
DN: CN = Prakash Ganpat Deshmukh, C = IN, S = Maharashtra, O = GOVT. OF MAHARASHTRA, OU = HOME DEPARTMENT
Date: 2015.05.21 11:56:00 +05'30'

( प्र. ग. देशमुख )

उपसचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन